प्रशासकीय मान्यता
केंद्र शासनाच्या ११ व्या पंचवार्षीक योजनांतर्गत पदव्युत्तर अभ्यासक्रमाच्या श्रेणीवर्धन योजनेंतर्गत केंद्र शासन हिस्साअंतर्गत मंजूर अनुदानातून यंत्र खरेदीस प्रशासकीय मान्यता.
शासकीय वैद्यकीय महाविद्यालय ,मिरज

महाराष्ट्र शासन
वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,
शासन निर्णय, क्रमांक : जीसीएम-२०१९/प्र.क्र.३१६/प्रशा-१
गोकुलदास तेजपाल रुग्णालय आवार, नवीन गो.ते.संकुल,
९ वा मजला, मंत्रालय, मुंबई -४०० ००१,
दिनांक : ३० जानेवारी, २०२०

**वाचा**
१) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६
२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/ आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७.
३) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/ आरोग्य-८, दिनांक ०७.०३.२०१८
४) स्वास्थ व कुटुंब कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्रमांक U.14017/31/2016-ME-II, दिनांक १०.०९.२०१८
५) संचालनालयाचे पत्र क्र.संवैशिवसं/शावैममि/केंद्रशासन हिस्सा/यंसाख/३१३०२/१-म/२०१९, दिनांक २१ नोव्हेंबर, २०१९
६) शासन पत्र क्रमांक पीजीएन २०१९/ प्र.क्र.२९५ / प्रशा-१, दिनांक १९.११.२०१९.

**शासन निर्णय :-**

शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, मिरज या संस्थेस संदर्भाधीन दिनांक १०.०९.२०१८ च्या पत्रान्वये केंद्र शासनाच्या ११ व्या पंचवार्षीक योजनांतर्गत पदव्युत्तर अभ्यासक्रमाच्या श्रेणीवर्धन योजनेंतर्गत केंद्र शासन हिस्साअंतर्गत मंजूर अनुदानातून उपलब्ध होणाऱ्या निधीतून पुढील तक्त्यात नमूद रुपये ५,५०,३४,९७३/- (रुपये पाच कोटी पन्नास लक्ष चौतीस हजार नऊशे त्र्याहत्तर फक्त ) ची यंत्रसामुग्री खरेदी करण्यासाठी या शासन निर्णयान्वये पुढील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | यंत्राचे नांव | नग | प्रती नग किंमत (रुपये) | एकूण किंमत (रुपये) |
|---|---|---|---|---|
| १. | इअर मायक्रोस्कोप | १ | २८,५०,००० | २८,५०,००० |
| २. | मायक्रोडिब्रायडर | १ | ७,२८,००० | ७,२८,००० |
| ३. | लॅपटॉप | ७ | ५९,५०० | ४,१६,५०० |
| ४. | इन्टेन्स् पल्स्ड् लाईट ॲण्ड आरएफ मशिन (आयपीएल विथ आरएफ) | १ | ४,९८,२१४ | ४,९८,२१४ |
| ५. | इलेक्ट्रो हायड्रॉलिक ऑपरेशन टेबल | ३ | ५,५९,३२० | १६,७७,९६० |
| ६. | वॉक इन कोल्ड रुम | १ | २३,१३,७०० | २३,१३,७०० |
| ७. | व्हॅक्युम डस्ट कलेक्टर विथ ॲटॉप्सी सॉ विथ ॲक्सेसरीज | २ | ३,५२,८२० | ७,०५,६४० |
| ८. | इसीटी मशीन | १ | ६०,००० | ६०,००० |
| ९. | ईसीजी मशीन | १ | १,००,८०० | १,००,८०० |
| १०. | एलसीडी प्रोजेक्टर | १ | ५१,५०० | ५१,५०० |
| ११. | ईईजी मशीन | १ | २,१०,५०० | २,१०,५०० |
| १२. | मम्मालियन हार्ट परफ्युजन असेम्ब्ली | १ | ६५,१२४ | ६५,१२४ |
| १३. | स्टुडन्ट फिजिओग्राफ | १ | २,४४,८५० | २,४४,८५० |
| १४. | डिजीटल एचपी मीटर | १ | ५२,५१० | ५२,५१० |
| १५. | इलेक्ट्रो कन्व्हलस् मीटर | १ | १,१४,४६० | १,१४,४६० |
| १६. | प्लेथीस्मोग्राफ रोडेन्ट | १ | २,५८,४२० | २,५८,४२० |
| १७. | लॅमीनार एलअरफ्लो सिस्टीम | १ | ७९,७३,४५९ | ७९,७३,४५९ |
| १८. | स्पाईन इन्डोस्कोप इन्स्ट्रुमेन्ट सिस्टीम | १ | ३४,१३,३८९ | ३४,१३,३८९ |
| १९. | न्युमॅटीक इलेक्ट्रीकल ड्रीम ॲण्ड रिमर | १ | २४,८३,६९४ | २४,८३,६९४ |
| २०. | सीआर्म इमेज इन्टेन्सीफायर | १ | ५०,४०,००० | ५०,४०,००० |
| २१. | स्पाईन इन्स्ट्रूमेन्टेशन सेट (पेडिकल स्क्रु ॲण्ड रॉड) | १ | २६,८०,०५० | २६,८०,०५० |
| २२. | स्मॉल ॲण्ड लार्ज फ्रॅगमेन्ट सेट | १ | ४,००,००० | ४,००,००० |
| २३. | सेट फॉर नी रिप्लेसमेन्ट | १ | ३४,२५,२६० | ३४,२५,२६० |
| २४. | जनरल इन्स्ट्रुमेन्ट सेट फॉर फ्रॅक्चर रिडक्शन | ६ | १,६०,००० | ९,६०,००० |
| २५. | प्लास्टर रुम इक्विपमेन्ट ॲण्ड प्लास्टर टेबल (प्लास्टीक) | १ | १५,००० | १५,००० |
| २६. | अल्ट्रा एचडी एलईडी इन्टरॲक्टीव्ह पॅनल | १ | ५,०९,७६० | ५,०९,७६० |
| २७. | रेफ्रिजरेटर | १ | ३८,००० | ३८,००० |
| २८. | एसपीएसएस स्टॅटीक्स् २६.० (फॉर टु युजर) | १ | ४,९१,०९६ | ४,९१,०९६ |
| २९. | बायनाक्युलर मायक्रोस्कोप विथ स्कॅनर | ४० | ५५,००० | २२,००,००० |

| अ.क्र. | यंत्राचे नांव | नग | प्रती नग किंमत (रुपये) | एकूण किंमत (रुपये) |
|---|---|---|---|---|
| ३०. | बायोसेप्टी कॅबिनेट टाईप- २ ए | २ | ७,४३,४०० | १४,८६,८०० |
| ३१. | डिप फ्रिजर - २० सी | १ | २,७५,००० | २,७५,००० |
| ३२. | ऑटोमेटेड आयडेन्टीफिकेशन ॲण्ड सेन्सेटीव्ह इक्विपमेन्ट | १ | १५,९३,००० | १५,९३,००० |
| ३३. | इन्क्युबेटर (लार्ज साईज) | १ | १,४३,९६० | १,४३,९६० |
| ३४. | ऑटोक्लेव्ह (लार्ज साईज) | १ | १,८३,९२७ | १,८३,९२७ |
| ३५. | कॉम्प्युटर विथ प्रिंटर ॲण्ड स्कॅनर | १ | १,४६,९०० | १,४६,९०० |
| ३६. | ॲडल्ट व्हेन्टीलेटर | १० | ८,४०,००० | ८४,००,००० |
| ३७. | डिफिब्रिलेटर विथ एईडी ॲण्ड पेसमेकर | १८ | ९८,५६० | १७,७४,०८० |
| ३८. | सिरींज पंप | १ | ३,३६,००० | ३,३६,००० |
| ३९. | लॅपटॉप | १० | ३३,६०० | ३,३६,००० |
| ४०. | मल्टीपॅरा विथ इटीसीओटू | २ | १,६५,७६० | ३,३१,५२० |
| | | | | ५,५०,३४,९७३ |

अटी :-

१. सदर प्रशासकीय मान्यता केंद्र शासनाच्या ११ व्या पंचवार्षीक योजनांतर्गत पदव्युत्तर अभ्यासक्रमाच्या श्रेणीवर्धन योजनेंतर्गत केंद्र शासनाचा राज्य शासनास प्राप्त झालेला निधी सदर आर्थिक वर्षात वापरण्यास परवानगी मिळणेबाबत उपरोक्त दिनांक १९.११.२०१९ च्या पत्रान्वये केंद्र शासनास पाठविलेल्या प्रस्तावास मान्यता मिळण्याच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

२. सदर यंत्रसामुग्री हाताळणीसाठी नव्याने पदनिर्मितीची आवश्यकता तसेच बांधकाम / विद्युतीकरणाची नाही, याबाबत संचालनालयाने व संबंधित अधिष्ठाता यांनी खातरजमा केली आहे.

३. सदर यंत्र सामुग्री संबंधित केंद्र- राज्य योजनेतंर्गत अनुज्ञेय आहे, याची खातरजमा संबधित संस्थेने केली आहे.

४. सदर विषयी " शासकीय विभागाने करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची नियमपुस्तिका " याबाबत उद्योग, ऊर्जा व कामगार व कामगार विभागाने निर्गमित केलेल्या शासन निर्णय क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६ मध्ये नमूद केलेल्या विहीत कार्यपध्दतीचे अनुपालन करण्यात यावे.

५. सदर यंत्रसामुग्री खरेदी विषयक प्रक्रिया " औषधे, तद्अनुषंगीक उपभोग्य वस्तू व वैद्यकीय उपकरणे या बाबींची खरेदी हाफकिन बायो-फामास्युटीकल्स कॉपोरेशन लि. मार्फत

करण्याबाबत " निर्गमित शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/ प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७ नुसार करावी.

६. सदर यंत्रसामुग्रीची आवश्यकता असल्याचे व त्याची किंमत बाजारभावापेक्षा जास्त नसल्याची खात्री संचालक ( वै.शि. ) तसेच संबंधित अधिष्ठाता यांनी करावी.

७. सदर यंत्रसामुग्रीची विनिर्दिष्टे व्यापक, सर्वसमावेशक असून त्यानुसार यंत्रपुरवठा करु शकणारे किमान तीन उत्पादक/पुरवठादार यांचेकडून तीन निविदा प्राप्त होऊ शकतील अशा प्रकारची आहेत, असे संचालक (वै.शि.) यांनी प्रमाणित करावे.

८. प्रस्तावित यंत्रसामुग्रीचा समावेश इतरत्र कोणत्याही प्रस्तावात अंतर्भुत केलेला नसल्याबाबत व सदर यंत्रसामुग्री संबंधित संस्थेस आवश्यक असल्याबाबत संचालकांनी खात्री करावी.

९. मुख्य यंत्र व त्यांचे सुटे भाग (Accessories) यांच्या किंमती भिन्न दर्शविणे आवश्यक राहील.

१०. सदर विषयी यंत्रसामुग्री खरेदीबाबत निर्णय घेताना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेल्या लेखाशिर्षाखाली मंजुर अनुदानाच्या तरतूदीपेक्षा जास्त खर्च केला जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

११. उपरोक्त शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार व कामगार विभाग, दिनांक ०१.१२.२०१६ मधील परिच्छेद क्रमांक ३.१.२ " किंमतीचा अंदाज व किंमतीचा वाजवीपणा " या शीर्षकाखालील परिच्छेद क्रमांक ३.१.२.१ मधील तरतूदीचे खरेदी समितीने अनुपालन करावे. त्यानुषंगाने यंत्राच्या किंमतीस आवश्यकतेनुसार सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येईल.

२. या प्रयोजनासाठी उपरोक्त तक्यात नमूद केलेल्या यंत्रसामुग्री खरेदीसाठी येणारा खर्च खालील लेखाशिर्षातून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक - एस ४

४२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च

०३ - वैद्यकीय शिक्षण व प्रशिक्षण संशोधन

१०५ - विषमचिकित्सा

(००) (४२) - राज्य शासकीय वैद्यक महाविद्यालयाचे बळकटीकरण व दर्जावाढ करणे व नवीन पदव्युत्तर पाठयक्रम सुरु करणे व पदव्युत्तर विद्यार्थ्यांच्या संख्येत वाढ करणे (४२१० २४३८)

५२ - यंत्रसामुग्री व साधनसामुग्री

३. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-१, उप विभाग -२, अनुक्रमांक-३, नियम क्रमांक-७ अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारान्वये हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००१३०१५२७०९५३१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ARUN MURLIDHAR RAO DAHALE

Digitally signed by ARUN MURLIDHARRAO DAHALE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=b335b52903c5914ab29c9ba5a50897b7b2244d66593f50dd713da83860912503, postalCode=400032, street=MANTRALAYA ,MUMBAI, serialNumber=30df743755280cf26ce97ec0978235f63f80f0bc4317129bf381eb48778f2e3d, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=ARUN MURLIDHARRAO DAHALE
Date: 2020.01.30 19:27:40 +05'30'

( अ. मु. डहाळे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. महालेखाकार - १ ( लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई.
२. व्यवस्थापकीय संचालक, हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स कॉपोरेशन लि., मुंबई.
३. संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई.
४. अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय ,मिरज.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, सांगली.
६. निवडनस्ती (प्रशा-१).